**नवनिर्मित स्त्री रुग्णालय धडगाव,जि. नंदूरबार येथील अस्थायी पदे पुढे चालु ठेवणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन निर्णय क्रमांकः अपदे- २०२४/ प्र.क्र.१२४/ आरोग्य-३**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक रुग्णालय, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: २९ एप्रिल, २०२४

<u>वाचा -</u>

1) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. पदनि-२०२२/प्र.क्र-१०/आरोग्य-३अ, दि. २३.०९.२०२२**
2) **वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दि.२१.०२.२०२४.**
3) **उपसंचालक, आरोग्य सेवा (नाशिक),यांचे पत्र क्रमांक-उपसंआसे/आस्था-४/स्त्री.रू. धडगाव/४३(४२) पदे/मुदतवाढ/२६४३७-५०/२४, दि. २३.०४.२०२४**

**शासन निर्णय-**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये नवनिर्मित स्त्री रुग्णालय धडगाव जि. नंदुरबार येथे ४३ अस्थायी पदांची निर्मिती करण्यात आली आहे. सदर संस्था कार्यान्वित राहण्यासाठी ४३ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची आवश्यकता आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये नवनिर्मित स्त्री रुग्णालय धडगाव जि. नंदुरबार येथील ४३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ पासून दि.३१.०८.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२४-२०२५ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**<u>मागणी क्रमांक-आर-१</u>**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
०६ - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना
(०६)(०१) - मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकिय रुग्णालये व दवाखाने (अनिवार्य) (२२१० ०२२६)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क,दिनांक-२१.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाच्या दि. २१.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत अस्थाई पदांना मुदतवाढीस मान्यता देण्यात आली असली तरी, दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकिय विभागांनी तातडीने प्रस्ताव सादर करण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. तसेच संदर्भ क्र.०२ अन्वये वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार अस्थायी पदांना दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली असून त्यादरम्यान सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याकरीता सुधारीत आकृतीबंधाचे प्रस्ताव शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९ जून,२०१७ नुसार तपासून व त्यानुसार कार्यवाही करुन तातडीने वित्त विभागास सादर करण्याकरीता आयुक्तालय कार्यालयाकडून उचित कार्यवाही करावी व त्याबाबातचा प्रस्ताव शासनास पाठवावा. तसेच यापुढे अस्थायी पदांना सुधारित आकृतीबंधात समावेश करण्याबाबतची कार्यवाही तातडीने करावयाची आहे. त्यामुळे अस्थायी पदांची मुदतवाढ ही शेवटची मुदतवाढ समजण्यात यावी व त्यानुसार आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी, याबाबतची कृपया नोंद घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४२४११२६५०१४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2024.04.29 12:22:42 +05'30'

**(क.प्र. पिसे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

२. संचालक-१, आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, नंदुरबार.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार.
८. वैद्यकीय अधिक्षक, ट्रामा केअर युनिट,नवापूर, जि.नंदुरबार
९. वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
१०.कार्यासन अधिकारी,सेवा-१सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई यांना पुढील आवश्यक कार्यवाहीसाठी.
११.निवडनस्ती (आरोग्य-३)

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक-अपदे-२०२४ /प्र.क्र.१२४/ आरोग्य-३,
दिनांक - २९ एप्रिल, २०२४ सोबतचे विवरणपत्र.)

| अ.क्र. | पदनाम | वेतन स्तर | अस्थायी पदे |
|---|---|---|---|
| १ | वैद्यकिय अधिक्षक वर्ग-१ | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| २ | वैद्यकिय अधिकारी प्रसवोत्तर (प्रसुती पश्चात) कार्यक्रम वर्ग-१ | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| ३ | बालरोग तज्ञ वर्ग-१ गट-अ | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| ४ | बधिरीकरण शास्त्रज्ञ वर्ग-१ गट-अ | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| ५ | क्ष-किरण शास्त्रज्ञ वर्ग-१ गट-अ | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| ६ | महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा गट अ (बधिरीकरण शास्त्रज्ञ) | एस-२० (५६१००-१७७५००) | २ |
| ७ | महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा गट अ (बालरोग तज्ञ) | एस-२० (५६१००-१७७५००) | २ |
| ८ | महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा गट अ (स्त्री रोग प्रसुतीशास्त्र तज्ञ) | एस-२० (५६१००-१७७५००) | ४ |
| ९ | महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा गट अ | एस-२० (५६१००-१७७५००) | ५ |
| १० | सहायक अधिसेविका | एस-१५ (४१८००-१३२३००) | १ |
| ११ | परिसेविका | एस-१४ (३८६००-११२८००) | ५ |
| १२ | अधिपरिचारिका | एस-१३ (३५४००-११२४००) | ८ |
| १३ | बालरोग परिचारिका | एस-१४ (३८६००-११२८००) | ३ |
| १४ | रक्तपेढी तंत्रज्ञ | एस-१३ (३५४००-११२४००) | १ |
| १५ | औषध निर्माता | एस-१० (२९२००-९२३००) | २ |
| १६ | भांडार तथा वस्त्रपाल | एस-६ (१९९००-६३२००) | १ |
| १७ | प्रशासकीय अधिकारी | एस-१५ (४१८००-१३२३००) | १ |
| १८ | अधिक्षक/लेखापाल/कारभारी | एस-१४ (३८६००-११२८००) | १ |
| १९ | वरिष्ठ लिपिक | एस-८ (२५५००-८११००) | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| २० | कनिष्ठ लिपिक | एस-६ (१९९००-६३२००) | १ |
| **एकूण अस्थायी पदे** | | | **४३** |